**सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक, गट-क या पदावर अतिरिक्त निवडयादीतील उमेदवारांना नामनिर्देशनाने तात्पुरती नियुक्ती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांक: पदभ-२०२४/प्र.क्र.८१/सेवा-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३० एप्रिल, २०२५

**संदर्भ :** १. सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्रमांक :एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२८१/१२, दि.२१.०६.२०२१.
२. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन आदेश क्र. पदभ-२०२४/प्र.क्र.८१/सेवा-३, दि. ०७.०३.२०२४ व दि. ०९.१०.२०२४
३. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन आदेश क्र. पदभ-२०२४/प्र.क्र.८१(9)/सेवा-३, दि. ०९.१०.२०२४
४. मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.विभाग, मुंबई यांचे क्र.मुअ(मुं)/वि.अ./पदभरती/७३१, दि. १४.०२.२०२४
५. मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.विभाग, मुंबई यांचे क्र.मुअ(मुं)/वि.अ./पदभरती/८८३ व ८८८, दि. २४.०२.२०२४

**शासन आदेश** :-

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत विविध पदांसाठी मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, मुंबई यांचेमार्फत राज्यस्तरीय भरती प्रक्रिया सन-२०२३ मध्ये राबविण्यात आली. या भरती प्रक्रियेतून स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक संवर्गातील एकूण १३७८ उमेदवारांपैकी, दि. ०७.०३.२०२४ रोजीच्या आदेशान्वये १३४४ उमेदवारांना, दि. ०९.१०.२०२४ रोजीच्या दोन स्वतंत्र आदेशांन्वये एकूण २३ (२२+१) उमेदवारांना अशा एकूण १३६७ उमेदवारांना नियुक्ती देण्यात आली. त्यानंतर विहित मुदतीत रूजू न झालेल्या नियुक्ती रद्द करण्यात आलेल्या ६९ व राजीनामा/ तांत्रिक बाब मंजूर करण्यात आलेल्या ५४ अशा एकूण १२३ उमेदवारांच्या जागी, बिंदुनुसार त्या त्या प्रवर्गातील अतिरिक्त निवडसूचीतील गुणवत्तेनुसार पात्र उमेदवारांची शिफारस करण्याबाबत मुख्य अभियंता, सा.बां. प्रा. विभाग, मुंबई यांना कळविण्यात आले. त्यानुषंगाने मुख्य अभियंता कार्यालयाने कागदपत्र पडताळणीअंती शिफारस केलेल्या पात्र ११७ उमेदवारांना दि.०९.१०.२०२४ रोजीच्या शासन आदेशान्वये नियुक्ती देण्यात आली.

२. रूजू झालेल्या उमेदवारांपैकी राजीनामा / तांत्रिक बाब मंजूर करण्यात आलेल्या ९४ व विहित कालावधीत रूजू न झालेल्या २१ अशा एकूण ११५ उमेदवारांच्या जागी त्या-त्या प्रवर्गातील प्रतिक्षायादीतील अन्य उमेदवारांची गुणवत्तेनुसार शिफारस करण्याची विनंती मुख्य अभियंता, सा.बां. प्रा. विभाग, मुंबई यांना करण्यात आली. त्यानुषंगाने मुख्य अभियंता कार्यालयाने संदर्भाधीन क्र. ४ येथील दि.१४.०२.२०२५ रोजीच्या

पत्रान्वये ८१ उमेदवारांची व संदर्भाधीन क्र. ५ येथील दि.२४.०२.२०२५ रोजीच्या पत्रांन्वये १२ अशा एकूण ९३ उमेदवारांची शिफारस शासनास केली आहे. सदर शिफारस पात्र उमेदवारांची सरळसेवेने सोबतच्या **परिशिष्ट-अ** मध्ये नमूद केल्यानुसार स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक, गट-क या पदावर ते रुजू होतील त्या दिनांकापासून (वेतनस्तर एस-८, रुपये २५,५००-८१,१००/- या वेतनश्रेणीत) तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे.

३. सोबतच्या **परिशिष्ट-अ** मधील उमेदवारांनी नियुक्ती आदेश प्राप्त झाल्यानंतर संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांच्याकडे हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत प्रत्यक्ष संपर्क साधावा व सेवेत रुजू व्हावे. अन्यथा, एक महिन्यानंतर सदर नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. सदर उमेदवारांना देण्यात आलेल्या पदस्थापनेत कोणताही बदल होणार नाही.

४. नियुक्ती देण्यात येत असलेल्या या उमेदवारांना रुजू करुन घेऊन त्यांचे पदस्थापनेबाबतचे आदेश संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांनी **तात्काळ** निर्गमित करावेत. तसेच, पदस्थापना देतांना संबंधित प्रादेशिक विभागाच्या क्षेत्रात येणाऱ्या राष्ट्रीय महामार्ग विभाग कार्यालयांमधील रिक्त पदे आवश्यकतेनुसार भरली जातील, याची दक्षता मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग (सा.बां.) विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांचेशी सल्लामसलत करुन घ्यावी.

५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी केलेल्या शिफारशीच्या अनुषंगाने सोबतच्या **परिशिष्ट-अ** मधील उमेदवारांची करण्यात आलेली नियुक्ती ही, सार्वजनिक बांधकाम विभागातील स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक, गट-क या पदाच्या सेवाभरती नियमातील तरतुदीनुसार भरतीसाठी उपलब्ध असलेल्या रिक्त पदावर, खालील विहित अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे:-

**१)** एखाद्या उमेदवारास विहित कालावधीत अपरिहार्य, उचित कारणास्तव रुजू होण्यासाठी मुदतवाढ हवी असल्यास त्या उमेदवारांनी सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १० दिवसांच्या आत अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना मुदतवाढीसाठी अर्ज सादर करावा. तद्नंतर प्राप्त झालेले अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत. उचित कारणास्तव विहित कालावधीत मुदतवाढीसाठी अर्ज करणाऱ्या उमेदवारांना मुदतवाढ देण्याचा/ नाकारण्याचा अंतिम निर्णय शासनाचा राहील.

**२)** जे उमेदवार या शासन निर्णय निर्गमित झालेल्या तारखेपासून **एक महिन्याच्या मुदतीच्या आत** नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणार नाहीत अथवा त्यांचेकडून यासंबंधात काही सूचना प्राप्त झाली नाही, तर त्यांना ही नियुक्ती त्यांना स्वीकृत नाही असे समजून उमेदवारांच्या नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. तसेच याबाबतचा अहवाल संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग /संबंधित अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी शासनाला दिनांक ३१ मे, २०२५ पर्यंत सादर करावा.

**३)** संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग/संबंधित अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी जाहिरातीत नमूद केल्यानुसार वयोमर्यादेची तसेच शैक्षणिक व अन्य अटींची पुर्तता करणारी मूळ कागदपत्रे (वय, अधिवास, शैक्षणिक पात्रता, महिला आरक्षणानुसार विहीत केलेले प्रमाणपत्र, जात वैधता प्रमाणपत्र, दिव्यांग प्रमाणपत्र, माजी सैनिक प्रमाणपत्र, प्रकल्पग्रस्त प्रमाणपत्र, भूकंपग्रस्त प्रमाणपत्र, पदवीधर/पदविकाधारक अंशकालीन उमेदवार प्रमाणपत्र, अनाथ प्रमाणपत्र इ.) तपासावीत.

४) सदर उमेदवारांची ज्येष्ठता ही सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २१.०६.२०२१ रोजीच्या शासन अधिसूचना अन्वये विनियमित केलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियम, २०२१ मधील तरतुदीनुसार गुणवत्ता क्रमांकानुसार निश्चित करण्यात येईल. त्यामुळे नियुक्तीच्या आदेशानुसार एक महिन्याच्या आत सेवेत रुजू न होणाऱ्या उमेदवारांना सेवा ज्येष्ठता गमवावी लागेल व त्यांची ज्येष्ठता ते ज्या दिनांकास शासन सेवेत रुजू होतील, त्या दिनांकास निश्चित करण्यात येईल.

५) मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर नियुक्त केलेल्या उमेदवारांची प्रचलित नियमातील तरतूदीनुसार जात वैधता प्रमाणपत्राच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येत आहे. मागासवर्गीय उमेदवारांनी जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र शासनास व संबंधित उमेदवारांची पदस्थापना देण्यात आलेल्या कार्यालयास सादर करणे आवश्यक राहील. त्यानुसार संबंधित उमेदवारांच्या मुळ सेवापुस्तकात नोंद घेण्याची कार्यवाही संबंधित कार्यालय प्रमुखांनी करावी.

६) तसेच, मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर (अ.जा., अ.ज., वि.जा.(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड), वि.मा.प्र., इ.मा.व.) नियुक्ती करण्यात आलेल्या मागासवर्गीय उमेदवारांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नसल्यास, त्यांनी या आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या आत जात प्रमाणपत्राची वैधता, जात प्रमाणपत्र पडताळणी समितीकडून करुन घेणे आवश्यक राहील. नियुक्ती देण्यात आलेल्या कार्यालयाने संबंधित मागसवर्गीय उमेदवारांच्या जात वैधता प्रमाणपत्राच्या अनुषंगाने आवश्यक ती कागदपत्रे जात प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पाठविण्याची कार्यवाही करावी. विहित मुदतीत जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्यास संबंधित उमेदवारांच्या सेवा प्रचलित नियमानुसार समाप्त करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

७) अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती वगळता अन्य मागासप्रवर्गातील महिलांकरीता आरक्षित असलेल्या पदावरील निवडीसाठी दावा करु इच्छिणा-या महिलांना त्या-त्या मागास प्रवर्गासांठी इतर मागासप्रवर्ग व बहुजन कल्याण विभाग तसेच सामान्य प्रशासन विभागाकडून वेळोवेळी विहीत करण्यात आल्याप्रमाणे नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे.

८) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय दिनांक २५.०५.२००१ मधील तरतुदीनुसार, मागास प्रवर्गातील महिलांसाठीच्या राखीव पदाकरीता निवड झालेल्या उमेदवारांनी, "महिलांसाठी उन्नत व प्रगत व्यक्ती गट (क्रिमीलेअर) यामध्ये मोडत नसल्याबाबतचे प्रमाणपत्र (अलिकडचे/ नवीनतम मूळ नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र) ची सांक्षाकित प्रत तपासणीसाठी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचेकडे पाठविणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने मागास प्रवर्गातील महिलांसाठीच्या राखीव पदाकरीता निवड झालेल्या महिला उमेदवारांचे नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र दोन प्रतीत शासनास पाठविण्याची कार्यवाही या आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत संबंधित मुख्य अभियंता/ संबंधित अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी करावी. मागास प्रवर्गातील महिलांसाठीच्या राखीव पदाकरीता निवड झालेल्या महिला उमेदवारांची नियुक्ती सदर तपासणी अहवालाच्या अधिन राहून करण्यात येत आहे. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचेकडून प्राप्त अहवालानुसार महिला उमेदवार अपात्र ठरत असल्यास त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

९) नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांनी हिन्दी व मराठी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल किंवा सदर भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर यासंबंधी असलेल्या नियमानुसार भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. भाषा परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास त्यांची वेतनवाढ प्रचलित नियमाप्रमाणे रोखून ठेवण्यात येईल.

१०) सदर उमेदवारांपैकी खेळाडू प्रवर्गातून निवड झालेल्या उमेदवारांना शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, शासन निर्णय, दि.०१.०७.२०१६ मधील तरतुदीनुसार व त्यानंतर शासनाने यासंदर्भात वेळावेळी निर्गमित केलेल्या आदेशांतील तरतुदींनुसार नियुक्ती देण्यात येत आहे. सदर तरतुदींची पूर्तता होत नसल्यास संबंधित उमेदवारांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

११) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.०७.०८.२००१ अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९.०३.२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून २ वर्षाच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहित मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

१२) या आदेशान्वये हजर होणाऱ्या उमेदवारांना राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजना (NPS) लागू राहील. तथापि, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक : अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.१८.०८.२००९ मधील तरतुदीनूसार दि.०१.११.२००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचाऱ्यांनी त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि.०१.११.२००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि.०१.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर नविन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परीपत्रक, वित्त विभाग क्रमांक : अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२.०१.२००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधित शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू राहील.

१३) उमेदवारांनी स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक, गट-क पदासाठी विहीत केलेली अर्हता परीक्षा व व्यावसायिक परीक्षा विहित कालावधीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

१४) स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यकांनी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास तसेच, त्याचे काम किंवा वर्तणूक अयोग्य अथवा अनुरुप असमाधानकारक आढळल्यास, तो सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

१५) सदर उमेदवारांपैकी पूर्वी शासकीय सेवेत असणाऱ्या उमेदवारांची सरळसेवेने शासनाच्या दुसऱ्या पदावर नियुक्ती झाली असल्यास अशा उमेदवारांची स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक या पदावरील वेतननिश्चिती ही शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: वेतन-१२८९/प्र.क्र.२/ ९०/सेवा-३, दिनांक २३.०३.१९९४ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी. अन्यथा, ज्या उमेदवारांची सरळसेवेने शासनाच्या सेवेत नव्याने नियुक्ती झाली असल्यास अशा उमेदवारांची स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक, गट-क या पदावरील वेतन निश्चिती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतूदीनुसार करण्यात यावी.

१६) सदर नियुक्ती उमेदवारांनी सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबून राहील. उमेदवारांनी सादर केलेली प्रमाणपत्रे तसेच सांक्षाकन नमुन्यात नमूद केलेली माहिती, नियुक्तीनंतर खोटी अथवा बनावट आढळल्यास, सदर उमेदवारांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

१७) उमेदवारांनी साक्षांकन नमुन्यात सादर केलेली माहिती नियुक्ती देण्यात आल्यानंतर असत्य असल्याचे आढळून आल्यास तात्पुरते नियुक्ती आदेश रद्दबादल करुन भारतीय दंडसंहितेनुसार फौजदारी कारवाई करुन सदर उमेदवारांना शासन सेवेत कायमस्वरुपी अपात्र ठरविण्यात येईल.

१८) उमेदवारांच्या सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

**१९)** आवश्यकता भासल्यास उमेदवारांना भारताच्या संरक्षण सेवेतील पदावर किंवा भारताच्या संरक्षणाशी निगडीत असलेल्या कुठल्याही पदावर देशात किंवा परदेशात प्रशिक्षणाचा कालावधी धरुन चार वर्षापेक्षा कमी नसणाऱ्या कालावधीसाठी भारत सरकार ठरवेल त्या शर्तीवर सेवा करावी लागेल. परंतु,

(अ) त्यांच्या नियुक्तीनंतर १० वर्षांचा कालावधी संपल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही किंवा,

(ब) सर्वसाधारणपणे त्यांच्या वयाची ४० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही.

**२०)** नियुक्ती देण्यात आलेला उमेदवार सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असल्यास, त्याला शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०९२/ १०३३/प्र.क्र.३३/ ९२/८, दिनांक ०२.१२.१९९७ मधील तरतूदीनुसार शासनाला किमान १ (एक) महिन्याची आगाऊ नोटीस किंवा एक महिन्याचे मूळ वेतन देणे आवश्यक राहील. मात्र, गैरशिस्त, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी वरीलप्रमाणे नोटीस देण्याचे बंधन शासनावर असणार नाही.

**२१)** सोबतच्या **परिशिष्ट-अ** प्रमाणे नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांना महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणासंबंधी, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : टीआरएन-०९/प्र.क्र.३९/ ०९/१२-अ, दिनांक २३.०९.२०११ मधील परिच्छेद सहा येथील तरतुदीनुसार दीर्घ कालावधीचे व विदेशी प्रशिक्षणापूर्वी प्रशिक्षणार्थीला सक्षम प्राधिकाऱ्याबरोबर बंधपत्र लिहून द्यावे लागेल व त्याप्रमाणे नंतर प्रशिक्षणार्थी नोकरी सोडत असेल तर प्रशिक्षणावर खर्च झालेली रक्कम सदर प्रशिक्षणार्थीकडून वसूल करून संबंधित प्राधिकाऱ्याला शासनाकडे जमा करावी लागेल. याबाबतचे दर शासन निश्चित करेल. सदर वसूली केल्याशिवाय प्रशिक्षणार्थीचा राजीनामा क्षेत्रीय स्तरावरुन स्विकारण्यात येऊ नये. त्यानुसार प्रत्येक प्रशिक्षणार्थीला महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी (मेटा), नाशिक येथे रूजू होण्यापूर्वी मुख्य अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांच्याकडे व संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडे विहित बंधपत्र भरून सादर करणे बंधनकारक राहील.

**२२)** प्रशिक्षणादरम्यान सर्व प्रशिक्षणार्थीकडून प्रबोधिनीच्या प्रशिक्षणाबाबतच्या नियमांचे व शिस्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. त्यांच्याकडून नियमभंग झाल्यास प्रबोधिनीकडून त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल.

**२३)** सर्व उमेदवारांचे वैद्यकीय तपासणी अहवाल प्राप्त होण्याच्या अधीन राहून त्यांची नियुक्ती करण्यात येत आहे. त्यानुसार संबंधित उमेदवार यांनी त्यांच्या नियुक्तीच्या ठिकाणी रुजू झाल्यानंतर त्यांनी वैद्यकीय अहवाल त्यांना नियुक्ती देण्यात आलेल्या कार्यालयास सादर करावा.

**२४)** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक चारित्र्य-२११७/ प्र.क्र.४८३/ २०१७/१६-अ, दिनांक २८.०८.२०१७ अन्वये सर्व उमेदवारांचे चारित्र्य पडताळणी अहवाल प्राप्त होण्याच्या अधीन राहून करण्यात येत आहे. त्यानुसार संबंधित उमेदवारांची त्यांच्या नियुक्तीच्या ठिकाणी रुजू झाल्यानंतर त्या कार्यालयामार्फत त्यांची चारित्र्य पडताळणी करण्यात येईल.

**२५)** तसेच, जे उमेदवार यापूर्वी अन्य विभागात अथवा या विभागात शासकीय सेवेत कार्यरत होते त्यांच्याबाबतीत ते ज्या विभागात/कार्यालयात कार्यरत होते त्या विभागाकडून/कार्यालयाकडून त्यांच्या विरूध्द कोणती विभागीय चौकशी सुरू होती किंवा प्रस्तावित आहे, याबाबतची माहिती प्राप्त करून घेण्याच्या अधीन राहून त्यांना तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे. जर एखाद्या उमेदवाराविरूध्द तो

यापूर्वी कार्यरत असलेल्या विभागात/कार्यालयात विभागीय चौकशी सुरू असल्यास तर सदर नियुक्तीनंतरही सदर चौकशी सुरू राहील.

**२६)** उमेदवार ज्या दिवशी रुजू होतील त्या दिवसापासून नियमाप्रमाणे त्यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यात यावेत व बदली झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्याकडे पाठवून विभाग प्रमुखांनी अथवा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी याबाबत शासनास कळवावे.

**२७)** सदर उमेदवार सध्या केंद्र/ राज्य शासनाच्या सेवेत अथवा निमशासकीय सेवेत कार्यरत असतील तर संबंधीत नियंत्रण अधिकाऱ्यांनी त्यांना नेमणूकीच्या ठिकाणी हजर होण्याच्या दृष्टीने सदर सेवेतून कार्यमुक्त झाल्याचे अथवा तसे लेखी पत्र सादर केल्याशिवाय त्यांना रूजू करून घेता येणार नाही. तसेच सदर उमेदवारांची नियुक्ती ही त्यांचे केंद्र/ राज्य शासनाच्या सेवेत अथवा निमशासकीय सेवेतील ना-चौकशी प्रमाणपत्र त्यांच्या संबंधित कार्यालयाकडून प्राप्त होण्याच्या अधीन राहील.

६. नियुक्ती देण्यात येत असलेल्या या उमेदवारांनी नियुक्तीच्या/पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता विशिष्ट ठिकाणी पदस्थापना /नियुक्ती मिळविण्यासाठी मा. लोकप्रतिनिधी/ खाजगी व्यक्ती किंवा संघटना यांचे मार्फत दडपण/दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, संबंधित उमेदवारांविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील तरतुदींनुसार शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४३०१४५९०६५८१८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

POOJA BHASKAR UDAWANT

Digitally signed by POOJA BHASKAR UDAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=3a216aeb67842b82e08ea38ee54173f5a527cd40299fd7cb135e0abc12d5ab49, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C0BDDEC9E386D4BD1D8C49113A8F429650B2609DEA0BDA6E1ED8FD55A0D6A5FD, cn=POOJA BHASKAR UDAWANT
Date: 2025.04.30 15:00:23 +05'30'

**( पुजा भा. उदावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित उमेदवार (ई-मेलद्वारे)
-यांनी संबंधित मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांचे कार्यालयात हजर होण्याकरीता संपर्क साधावा.

**प्रत,**

**१)** महालेखापाल १/२, लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा महाराष्ट्र मुंबई/नागपूर ,
**२)** मा. मंत्री (सां.बा.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
**३)** अपर मुख्य सचिव (सा.बां.वि.), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई,
**४)** सचिव (बांधकामे/रस्ते), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
**५)** मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर / अमरावती /छ. संभाजीनगर / नांदेड / नाशिक / पुणे / मुंबई / कोकण
**६)** मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण भवन, नवी मुंबई
**७)** सर्व संबंधित अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळे
**८)** सह सचिव (सेवा/संनि),सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
**९)** कार्यासन अधिकारी [आस्थापना-१/आस्थापना-३/सेवा-२], सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
**१०)** निवडनस्ती, सेवा-३

शासन आदेश क्र. पदभ २०२४/प्र.क्र.८१/सेवा-३, दि.३० एप्रिल, २०२५ सोबतचे

## परिशिष्ट-अ

| अ.क्र. | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यकाचे नाव | उमेदवाराचा मूळ प्रवर्ग | निवडीचा प्रवर्ग | पदस्थापना देण्यात आलेला सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | RUSHIKESH SHARADRAO LAWANGE<br>श्री. ऋषिकेश शरदराव लवंगे | खुला | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| २ | PRATIK LAXMAN KAWATHE<br>श्री. प्रतीक लक्ष्मण कवठे | खुला | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, छ.संभाजीनगर** |
| ३ | SHUBHAM RAJENDRA BADGUJAR<br>श्री. शुभम राजेंद्र बडगुजर | खुला | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| ४ | ROHIT SACHIN CHEDE<br>श्री. रोहित सचिन चेदे | खुला | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, मुंबई** |
| ५ | GAURAV ASHOK PALVE<br>श्री. गौरव अशोक पालवे | भज-ड | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, मुंबई** |
| ६ | NISHANT MOHANRAO KADAM<br>श्री. निशांत मोहनराव कदम | खुला | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, छ.संभाजीनगर** |
| ७ | SUNIL MOHAN DHATRAK<br>श्री. सुनील मोहन धात्रक | भज-ड | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, मुंबई** |
| ८ | PUSHKARAJ SANJAY MANE<br>श्री. पुष्कराज संजय माने | खुला | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, मुंबई** |
| ९ | SANGRAM SANJAY PAWAR<br>श्री. संग्राम संजय पवार | खुला | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, कोकण** |
| १० | BHUSHAN PRAKASH PATIL<br>श्री. भूषण प्रकाश पाटील | इमाव | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| ११ | GAURAV SANJAY NIMKAR<br>श्री. गौरव संजय निमकर | इमाव | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| १२ | KUNAL NARAYAN SONAWANE<br>श्री. कुणाल नारायण सोनवणे | इमाव | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| १३ | SAGAR BHASKAR KAKADE<br>श्री. सागर भास्कर काकडे | इमाव | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, कोकण** |
| १४ | BHUSHAN NAMDEO KOLHE<br>श्री. भूषण नामदेव कोल्हे | इमाव | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| १५ | SUSHIL BHANUDAS GADEKAR<br>श्री. सुशील भानुदास गाडेकर | इमाव | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, मुंबई** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १६ | AJAY SANTOSH AHIRE<br>श्री. अजय संतोष अहिरे | इमाव | खुला-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, मुंबई** |
| १७ | PAWAN RAJESHWAR THAKARE<br>श्री. पवन राजेश्वर ठाकरे | इमाव | इमाव-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| १८ | SUMIT SUBHASH GURAV<br>श्री. सुमित सुभाष गुरुव | इमाव | इमाव-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, कोकण** |
| १९ | ANKIT KAMLAKAR FULDEORE<br>श्री. अंकित कमलाकर फुलदेवरे | इमाव | इमाव-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, नाशिक** |
| २० | RAHUL ASHOK JAISWAL<br>श्री. राहुल अशोक जयस्वाल | इमाव | इमाव-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| २१ | JAYRAJ RAMESH DHERE<br>श्री. जयराज रमेश ढेरे | आदुघ | आदुघ-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, कोकण** |
| २२ | NITIN DATTATRAY MORE<br>श्री. नितीन दत्तात्रय मोरे | आदुघ | आदुघ-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, कोकण** |
| २३ | YOGESH BALASO DESAI<br>श्री. योगेश बाळासो देसाई | आदुघ | आदुघ-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, कोकण** |
| २४ | MAQSUD BADAR CHAUS<br>श्री. मकसूद बदर चौस | आदुघ | आदुघ-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| २५ | PRAMOD DINKAR POKALE<br>श्री. प्रमोद दिनकर पोकळे | आदुघ | आदुघ-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, कोकण** |
| २६ | VAIBHAV BALU RAJNOR<br>श्री. वैभव बाळू राजनोर | भज-क | भज-क-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, नाशिक** |
| २७ | NAVIN BIBHISHAN SABALE<br>श्री. नवीन बिभीषण साबळे | अजा | अजा-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, छ.संभाजीनगर** |
| २८ | AKASH SUBHASH SOLASE<br>श्री.आकाश सुभाष सोलासे | अजा | अजा-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| २९ | SUYASH SURESH KAMBLE<br>श्री. सुयश सुरेश कांबळे | अजा | अजा-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, कोकण** |
| ३० | SIDDHARTH UTTAMRAO UGHADE<br>श्री.सिद्धार्थ उत्तमराव उघाडे | अजा | अजा-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, छ.संभाजीनगर** |
| ३१ | MAYUR SATYAWAN BHAGAT<br>श्री. मयूर सत्यवान भगत | अजा | अजा-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ३२ | SAGAR PRAKASH MYADAM<br>श्री. सागर प्रकाश म्यादम | विमाप्र | विमाप्र-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, कोकण** |
| ३३ | SUHAS SANJAY JADHAV<br>श्री. सुहास संजय जाधव | विजा-अ | विजा-अ-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ३४ | JAYPAL LAXMAN RATHOD<br>श्री. जयपाल लक्ष्मण राठोड | विजा-अ | विजा-अ-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ३५ | SAHILSHA RAJU FAKIR<br>श्री. साहिलशा राजू फकीर | विजा-अ | विजा-अ-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३६ | AVINASH PURANSING RATHOD<br>श्री.अविनाश पुरणसिंग राठोड | विजा-अ | विजा-अ-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| ३७ | SHWETA SHYAM BAJPAI<br>श्रीमती श्वेता श्याम बाजपेयी | खुला | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, छ.संभाजीनगर** |
| ३८ | KOMAL BABAN MORE<br>श्रीमती कोमल बबन मोरे | खुला | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ३९ | SHRUTI RAMCHANDRA TADGE<br>श्रीमती श्रुती रामचंद्र ताडगे | खुला | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ४० | AKANKSHA MAHESH CHAKOR<br>श्रीमती आकांक्षा महेश चकोर | भज-ड | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ४१ | ARCHANA ARJUN PATIL<br>श्रीमती अर्चना अर्जुन पाटील | खुला | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, कोकण** |
| ४२ | ANKITA PRAKASH JAYBHAY<br>श्रीमती अंकिता प्रकाश जायभाय | भज-ड | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, छ.संभाजीनगर** |
| ४३ | BISMILLA MUBARAK PATHAN<br>श्रीमती बिस्मिल्ला मुबारक पठाण | खुला | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ४४ | PRANALI PRAKASH PALE<br>श्रीमती प्रणाली प्रकाश पाले | भज-ड | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ४५ | GAURI SHRIRAM KULKARNI<br>श्रीमती गौरी श्रीराम कुलकर्णी | खुला | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ४६ | SUPRIYA RAMDAS DHATRAK<br>श्रीमती सुप्रिया रामदास धात्रक | भज-ड | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ४७ | POONAM HARISHCHANDRA KHAJURE<br>श्रीमती पूनम हरिश्चंद्र खजुरे | खुला | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ४८ | KOMAL NAMDEV PATIL<br>श्रीमती कोमल नामदेव पाटील | खुला | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ४९ | NILAM JAMIL KAZI<br>श्रीमती नीलम जमील काझी | खुला | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ५० | APURVA SHRIMANT SHINDE<br>श्रीमती अपूर्वा श्रीमंत शिंदे | खुला | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, मुंबई** |
| ५१ | KSHITIJA SOMNATH PAWASE<br>श्रीमती क्षितीजा सोमनाथ पावसे | इमाव | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ५२ | MAYURI RATAN BHOR<br>श्रीमती मयुरी रतन भोर | इमाव | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ५३ | ABHILASHA GANESH KAWALKAR<br>श्रीमती अभिलाषा गणेश कवलकर | इमाव | खुला-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| ५४ | KIRTI BHASKAR DESALE<br>श्रीमती कीर्ती भास्कर देसले | इमाव | इमाव-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, मुंबई** |
| ५५ | HEMALI CHANDRAVADAN MAHAJAN<br>श्रीमती हेमाली चंद्रवदन महाजन | इमाव | इमाव-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ५६ | MANISHA RAMESH MANDALE<br>श्रीमती मनीषा रमेश मंडले | इमाव | इमाव-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ५७ | MANASI PRASHANT BATHE<br>श्रीमती मानसी प्रशांत बाथे | आदुघ | आदुघ-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ५८ | MANJIRI AVINASH UTTARWAR<br>श्रीमती मंजिरी अविनाश उत्तरवार | आदुघ | आदुघ-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| ५९ | NEHAL BHAGWAT PATIL<br>श्रीमती नेहल भागवत पाटील | आदुघ | आदुघ-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, छ.संभाजीनगर** |
| ६० | VIKAS SHAMRAO BODAKE<br>श्री. विकास शामराव बोडके | भज-क | भज-क-प्रकल्पग्रस्त | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ६१ | SHRADDHA GOVIND KAMBLE<br>श्रीमती श्रद्धा गोविंद कांबळे | अजा | अजा-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ६२ | AJAY BALASAHEB SATHE<br>श्री. अजय बाळासाहेब साठे | आदुघ | आदुघ-प्रकल्पग्रस्त | **सा.बां.प्रा.विभाग, छ.संभाजीनगर** |
| ६३ | NAMRATA NAVNATH GHORPADE<br>श्रीमती नम्रता नवनाथ घोरपडे | अजा | अजा-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, छ.संभाजीनगर** |
| ६४ | RUCHIKA SOPAN PATIL<br>श्रीमती रुचिका सोपान पाटील | अजा | अजा-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ६५ | CHETAN VASANTRAO BAHIRAM<br>श्री. चेतन वसंतराव बहिरम | अज | अज-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ६६ | DHARMESH POPAT BAHIRAM<br>श्री. धर्मेश पोपट बहिरम | अज | अज-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ६७ | HANSRAJ UMARSING GAVIT<br>श्री. हंसराज उमरसिंग गावित | अज | अज-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, नाशिक** |
| ६८ | PRADIP GYANDEO CHAURE<br>श्री. प्रदीप ग्यानदेव चौरे | अज | अज-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ६९ | OM RAJARAM PAWAR<br>श्री. ओम राजाराम पवार | अज | अज-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| ७० | SUMEET SUBHASH BHOYE<br>श्री. सुमित सुभाष भोये | अज | अज-सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ७१ | SHWETA MOTILAL PAWAR<br>श्रीमती श्वेता मोतीलाल पवार | अज | अज-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ७२ | PRATIBHA PRAKASH THEPANE<br>श्रीमती प्रतिभा प्रकाश थेपने | अज | अज-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ७३ | AKASH GAUTAM SHELARE<br>श्री. आकाश गौतम शेलारे | अजा | दिव्यांग (a) LV (SC) | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| ७४ | ANIKET SAMBHAJI SAWANT<br>श्री.अनिकेत संभाजी सावंत | आदुघ | आदुघ-खेळाडू | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ७५ | GANESH SUNIL CHATE<br>श्री. गणेश सुनील चाटे | भज-ड | दिव्यांग-(b) | **सा.बां.प्रा.विभाग, छ.संभाजीनगर** |
| ७६ | AKSHAY BIBHISHAN PANDHARE<br>श्री. अक्षय बिभीषण पांढरे | भज-क | भज-क-खेळाडू | **सा.बां.प्रा.विभाग, छ.संभाजीनगर** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ७७ | TANVEER ALI TAYYAB ALI SAYYAD<br>श्री. तन्वीर अली तैय्यब अली सय्यद | इमाव | इमाव— खेळाडू | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ७८ | KIRAN BHIMRAO MISAL<br>श्री.किरण भिमराव मिसाळ | अजा | अजा- खेळाडू | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| ७९ | DHANRAJ DNYANESHWAR BURADE<br>श्री. धनराज ज्ञानेश्वर बुराडे | इमाव | इमाव-माजी सैनिक | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ८० | AMOL PRAKASH AWCHAR<br>श्री. अमोल प्रकाश अवचार | इमाव | इमाव-माजी सैनिक | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| ८१ | SANJAY RAOSAHEB JADHAV<br>श्री. संजय रावसाहेब जाधव | आदुघ | आदुघ- माजी सैनिक | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ८२ | SUMIT SUBHASH UMRANE<br>श्री. सुमित सुभाष उमराणे | विमाप्र | विमाप्र- सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ८३ | AKASH GAJANAN JADHAV<br>श्री.आकाश गजानन जाधव | विजा-अ | विजा-अ- सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| ८४ | MAHEK ANSAR SHAIKH<br>श्री. महेक अन्सार शेख | खुला | खुला- महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ८५ | PUJA RAJARAM KANAP<br>श्रीमती पूजा राजाराम कानप | भज-क | भज-क- महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ८६ | PRANOTI NAMDEV MANE<br>श्रीमती प्रणोती नामदेव माने | आदुघ | आदुघ- महिला | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ८७ | OMKAR NARSING KALEGAVKAR<br>श्री.ओंकार नरसिंग काळेगावकर | खुला | खुला- भूकंपग्रस्त | **सा.बां.प्रा.विभाग, नागपूर** |
| ८८ | AKASH ARUN CHAVAN<br>श्री. आकाश अरुण चव्हाण | अज | अज- सर्वसाधारण | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| ८९ | MANGAL LAHU KULAL<br>श्री. मंगल लहू कुलाल | अज | अज-महिला | **सा.बां.प्रा.विभाग, कोकण** |
| ९० | PALLAVI RAJENDRA GARJE<br>श्रीमती पल्लवी राजेंद्र गर्जे | खुला | खुला- खेळाडू | **सा.बां.प्रा.विभाग, कोकण** |
| ९१ | VAIBHAV ARVINDRAO TIDKE<br>श्री.वैभव अरविंदराव तिडके | भज-ड | दिव्यांग (b) | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| ९२ | SANJAY JAMMAN KHILLARE<br>श्री. संजय जम्मन खिल्लारे | भज-क | भज-क- माजी सैनिक | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |
| ९३ | JAGDISH YUVRAJ RATHOD<br>श्री. जगदीश युवराज राठोड | विजा-अ | विजा-अ- भूकंपग्रस्त | **सा.बां.प्रा.विभाग, अमरावती** |

**********